सन २०१५-१६ करिता राज्य योजनेतंर्गत मृद संधारणासाठी वनरोपन या कामांकरिताचा विविध वनवृत्तांचा नवीन बाब प्रस्ताव. (४४०६००४४)

महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग,

शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१५/प्र.क्र.१४८/फ-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- २७ जुलै, २०१५

वाचा :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.०४.२०१५.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.३०/४८४/२०१५-१६, दि.१९.०६.२०१५.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.३०/५०२/२०१५-१६, दि.२३.०६.२०१५.

**प्रस्तावना :-**

राज्य योजना सन २०१५-१६ अंतर्गत "मृद संधारणासाठी वनरोपण" (४४०६ ००४४) या योजनेकरिता रु.१०००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून रु.७००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. त्याअनुषंगाने सन २०१५-१६ या वर्षामध्ये धुळे, चंद्रपूर, कोल्हापूर व गडचिरोली वनवृत्तामधील ४९६ हेक्टर क्षेत्रावर वनीकरणाची पुर्वपावसाळी कामे करण्याकरिता रु.२२६.५९ लक्ष रक्कमेचा नवीन बाब प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ व ३ येथील पत्रान्वये मान्यतेसाठी सादर केला असून सदरची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

२. वित्त विभागाच्या दि.१७.०४.२०१५ रोजीच्या परिपत्रकामध्ये अर्थसंकल्पित निधीच्या ७० % च्या मर्यादेत निधी वितरीत करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. सन २०१५-१६ मध्ये ४४०६००४४ या संकेतांकाअंतर्गत अर्थसंकल्पीत निधीच्या ७० % मर्यादेत रु.१९६.१२ लक्ष इतकी रक्कम वितरणाकरीता शिल्लक राहत आहे. याअनुषंगाने प्रस्तावांतर्गत मागणी केलेल्या रु.२२६.५९ लक्ष रक्कमेपैकी **रु.१९६.१२ लक्ष (०२ मजूरी - रु.१८५.२५ लक्ष व २१ पुरवठा व सामुग्री - रु.१०.८७ लक्ष )** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. वितरित करण्यात येणा-या निधीचा वनवृत्तनिहाय तपशिल खालीलप्रमाणे आहे :-

(रक्कम लाखात)

| अ. क्र. | वनवृत्त | क्षेत्र हेक्टर | प्रस्तावाची रक्कम | मान्य केलेली रक्कम | या शासन निर्णयान्वये वितरित केलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | धुळे | २४३ | ७४.९८ | ७४.९८ | ७४.९८ |
| २ | चंद्रपूर | १०० | ३१.३९ | ३१.३९ | ३१.३९ |
| ३ | कोल्हापूर | १८ | ४५.०० | ४५.०० | ४५.०० |
| ४ | गडचिरोली | १३५ | ७५.२२ | ७५.२२ | ४४.७५ |
| | **एकूण** | **४९६** | **२२६.५९** | **२२६.५९** | **१९६.१२** |

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील दि.१७.०४.२०१५ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

४. सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-१०, प्रधान शीर्ष - ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, १०१ वनसंरक्षण विकास व पुननिर्मिती, (००)(०२) मृद संधारणासाठी वनरोपण (४४०६ ००४४) या लेखा शिर्षाअंतर्गत सन २०१५-१६ मध्ये मंजुर होणा-या अनुदानातुन भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ वरील दि.१७.०४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र/१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५.०५.२००९ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२७१२४७००९९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.07.27 12:50:12 +05'30'

**(द.ल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), धुळे, चंद्रपूर, कोल्हापूर व गडचिरोली
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
६) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे, चंद्रपूर, कोल्हापूर, सातारा, सांगली व गडचिरोली
८) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

## विवरणपत्र - १

शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१५/प्र.क्र.१४८/फ-२, दि.२७.०७.२०१५

मासिक निधी विवरणपत्र सन २०१५-१६

**योजनेचे नांव :- राज्य योजनेअंतर्गत सन २०१५-१६ करिता मृद संधारणासाठी वनीकरणे या योजनेअंतर्गत धुळे, चंद्रपूर, कोल्हापूर व गडचिरोली वनवृत्तातील पुर्वपावसाळी कामांचा नवीन बाब प्रस्ताव रु.१९६.१२ लक्ष**

**(४४०६ ००४४)**

**(रु.लाखात)**

| तपशिलवार शीर्ष | प्रस्तावांतर्गत मागणी केलेली रक्कम | ऑक्टोबर २०१५ | नोव्हेंबर २०१५ | डिसेंबर २०१५ | जानेवारी २०१६ | फेब्रुवारी २०१६ | मार्च २०१६ | एकुण वाटप केलेली रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ०२ मजूरी | १८५.२५ | ३०.९० | ३०.८७ | ३०.८७ | ३०.८७ | ३०.८७ | ३०.८७ | १८५.२५ |
| २१ पुरवठा व सामुग्री | १०.८७ | १.८७ | १.८० | १.८० | १.८० | १.८० | १.८० | १०.८७ |
| **एकूण** | **१९६.१२** | **३२.७७** | **३२.६७** | **३२.६७** | **३२.६७** | **३२.६७** | **३२.६७** | **१९६.१२** |

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.07.27 12:50:32 +05'30'

**(द.ल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग